# खाण्यासाठी धूळ

एन टर्नर

चित्र: रॉबर्ट बैरेट

मराठी: अश्विनी बर्वे



# खाण्यासाठी धूळ

एन टर्नर

चित्र: रॉबर्ट बैरेट

मराठी: अश्विनी बर्वे



## अनुक्रमणिका




# १. धुळीचे तूफ़ान

आम्ही एका छोट्या घरात राहत होतो. एका मोकळ्या जागेवर.

आईजवळ रेडिओ होता आणि आम्हाला
रात्री नाच करायला खूप आवडत असे.

बाबा मला म्हणाले,

“तू गवतासारखा वाढत आहे, जेक!”

“मी मक्याच्या झाडा इतका उंच आहे,” मी म्हटले.

पण एक वर्षी पाऊस आला नाही, पण वारं वाहत होतं. आम्ही रेडिओ ऐकला नाही आणि आम्ही नाच सुद्धा केला नाही.

“आपला गहूसुद्धा तुझ्यासारखा वेगाने वाढला असता तर जेक,” बाबा म्हणाले.

“पाऊस कुठे गेला?” मैगीने विचारले. बाबांनी फक्त आपले डोके हलवले. आम्ही सगळ्यांनी आकाशाकडे बघितले आणि चिंतेत पडलो.



हवा वेगाने वाहत असल्याने धूळ आमच्या घरात आणि आमच्या चेहऱ्यावर उडाली. एका रात्री मी म्हटले की, “आपण रात्रीच्या जेवणात धूळ खात आहोत.” पण माझ्या बोलण्यावर कोणीच हसले नाही.





दुसऱ्या दिवशी आकाश काळवंडून गेले.

“तो गडगडाट ऐकला का?” मैगी ओरडली.

गायी इकडे-तिकडे धावत होत्या. आमचा कुत्रा सॅम भुंकायला लागला आणि ओरडू लागला.

“वादळ येत आहे!” बाबा ओरडले.

“लवकर चला! गुरांना गोठ्यात ठेवायला मदत करा.

"मैगी, स्नोबॉलला विसरू नकोस.” मी म्हटले.



मग काळे ढग आकाशात सगळीकडे पसरले. विजा चमकल्या.

“घराकडे पळा,” बाबा ओरडले..

धुळीचा फटकारा माझ्या चेहऱ्यावर बसला.





बाबांनी सर्व खिडक्या आणि दारं लावली. पण तरीही धुळ आत येतच होती.

“कोणी धुळीला थांबवू शकत नाही.” आई दुःखाने म्हणाली. आईने आम्हाला ओले फडके दिले, जे आम्ही आमच्या चेहऱ्याला बांधू शकत होतो. वादळाचा एवढा आवाज येत होता, जणू एखादी ट्रेन जात आहे असे वाटत होते.

खूप वेळानंतर हवा वाहण्याची थांबली. आई म्हणाली, “आता वादळ थांबलं आहे.”

“पाऊस नसतांनाही वादळ कसे आले?” मैगीने विचारले.



बाबा म्हणाले, “हे धुळीचे वादळ आहे, काळ्या बर्फाच्या वादळा सारखे.”

आई खोकत म्हणाली, “पाऊस नंतर येईल, कदाचित पुढचे वर्षे चांगले असेल.”



# २. विकली गेली

पण पुढच्या वर्षी सुद्धा पाऊस आला नाही. मक्याचे आणि गव्हाचे रोपं लावता आले नाही.

“झाडांचा सांगाडा झालेला दिसत होता,” मैगीने म्हटले.

“जनावरांना पिण्यासाठी सुद्धा पुरेसे पाणी नाही.” मी म्हटले. आम्ही घाबरलो. तरीही अजून दोन धुळीची वादळे झाली आणि आमची पाच गायी मेल्या.





एका रात्री वडील म्हणाले, “आता पैसे नाहीत आपल्याकडे पीक आले नाही याचा अर्थ पैसे संपले.”

“आपल्याला शेत विकावे लागेल का?” मी विचारले.

“हो,” बाबा म्हणाले. “लिलावात, आपल्या शेजाऱ्यांनी विकले तसे.”



“कदाचित दुसऱ्या जागी यापेक्षा चांगली परिस्थिती असेल,” आई म्हणाली.

“आपले शेजारी कॅलिफोर्नियाल गेले,” बाबा म्हणाले, “आपण पण तिथेच जाऊ या, तिथे नोकरी मिळेल आणि धूळ पण नसेल.

"कैलिफ़ोर्नियात धूळ नसेल,” मैगीने गात म्हणाली आणि आम्ही सगळे हसलो.

लिलावाच दिवस आला.

एक काळी कार आली.

“हे एखाद्या अंतिम संस्कारासारखे वाटत आहे,” मी आईला म्हटले.

आईने रेडिओ धरला आणि म्हणाली, “घाई कर, जेक याला भुश्यात लपव. पण आम्ही तो रेडिओ घेऊन जाऊ शकलो नाही.



जेव्हा मी बाहेर आलो, तेव्हा एक माणूस आईची खुर्ची विकत होता.

“विकली गेली!” तो माणूस म्हणाला. एका अनोळखी माणसाने ती खरेदी केली.

"ते स्नोबॉल विकत आहेत,”

मैगीने म्हटले. आणि आपले डोळे तिने चोळले.

“विकली गेली!”

आणि मि. ब्राउन यांनी मैगीची मेंढी आणि आमच्या गायी खरेदी केल्या.







मग मैगी आणि मी भूश्याच्या ढिगावर बसलो. “आता हे शेत आपले राहिले नाही.” मी दुःखी होऊन म्हणालो.

“उद्या आपण इथून जाणार.”

“कमीत कमी त्यांनी आईचा रेडिओ विकला नाही” मैगीने म्हटले.

“आणि आपल्याजवळ अजूनही सॅम कुत्रा आहे,” मी म्हटले.

# ३. पुढे जाणे

पुढच्या दिवशी आम्ही आमचे सामान भरले. “ते आमचा ट्रक घेऊन जाऊ शकले नाही.” बाबा म्हणाले.

“गाडी आपली आहे! जेक, आपला रेडिओ घेऊन ये.”

“ते आपले संगीत नेऊ शकले नाहीत!"

आई म्हणाली, आणि मग बाबा पहिल्यांदा हसले.

“चल, सॅम” बाबा म्हणाले.







मैगीने निरोप घेतला,पण मी म्हणालो, “तू कोणाला टाटा करत आहे? आपल्याला ओलखणारे सर्वजण आधीच शेत विकून पश्चिमेला गेले आहेत.

“जेव्हा आपण कॅलिफोर्नियाला पोहचू, तेव्हा आपण रात्री धूळ खाणार आहे का?” मैगीने विचारले. बाबांनी गियर बदलला आणि ओरडले, "कैलिफोर्नियेत काही धूळ नसणार!” आम्ही गाऊ लागलो आणि सॅम आपल्या उंच आवाजात गाऊ लागला.

बाबांनी पूर्ण दिवसभर गाडी चालवली. त्या रात्री आम्ही आमचा तंबू इतर लोकांच्या शेजारी रस्त्याच्या कडेला लावला.

“प्रत्येकजण पश्चिमेकडे जात आहेत,” आई म्हणाली.

“मला आपल्या घराची आठवण येत आहे,” मैगीने हळुवार आवाजात म्हटले.

“मला ही,” मी म्हटले आणि मग आईने सॅमला जवळ घेतले.





आम्ही सूर्य उगवण्याच्या आधी निघालो. बाबा रस्त्याच्या कडेला असणाऱ्या शेतात थांबलो. त्यांनी आणि आईने विचारले.

“आम्ही तुमच्या गाईनचे दूध काढू शकतो का?” त्याच्या बदल्यात तुम्ही आम्हाला जेवण द्या.”

“त्या दिवशी तर आम्हाला काम मिळाले. पण इतर दिवस काम मिळाले नाही आणि आमच्याजवळ खाण्यासाठी केवळ पोळी आणि पाणीच राहिले होते.





त्या रात्री आई बाबांना म्हणाली, “आता रेडिओ विकण्याची वेळ आली आहे.”

“आत्ता नाही,” बाबा म्हणाले.

“मी काहीतरी काम शोधून काढेन. आपण थोडी वाट बघू या.”

“जर बाबांना कॅलिफोर्निया मध्ये नोकरी मिळाली नाही तर?” मी विचारले.

“चूप बस,” आई म्हणाली.

“बाबा काही ना काही काम नक्की शोधतील.”



# ४. संकट

बाबांना रस्त्यात छोटेमोठे काम मिळाले. आणि आम्ही रेडिओ विकल नाही. तीन आठवड्यानंतर बाबांनी गाडी एका मोठ्या शेतात थांबवली. त्यांनी फार्महाऊसचा दरवाजा ठोठावला. आम्ही गाडीत वाट बघत होतो.





दुसऱ्या दिवशी बाबांनी बागेत काम केलं. आणि आईने मोठ्या घरात मदत केली. मैगी आणि मी कोंबड्याना खायला घातलं.

“चांगला वाग, सॅम,” मी म्हटलं.

“या कोंबड्याकडे बघू सुद्धा नकोस.”

आईने माझा हात घट्ट धरला. काहीवेळा नंतर बाबा परत आले आणि ते जोरजोरात ओरडले “मला एक चांगले काम मिळाले आहे.” मैगी आणि मी बाहेर आलो आणि नाचू लागलो. आम्ही हसलो आणि गाणं गाऊ लागलो.

*"शी विल बी कमिंग अराउंड द माउंटेन्स."*



त्या रात्री आम्ही मास खाल्ले आणि आईने आमच्यासाठी गाणं म्हटलं.

सकाळी बाबा म्हणाले, “चला तंबू नीट करू या.”

जेव्हा आमचे काम संपले तेव्हा मी सॅमला शोधले. पण तो गायब होता. अचानक मी एक जोरदार आवाज ऐकला..







"जेक, कोंबड्या!“ मैगी ओरडली. आम्ही कोंबड्याच्या खुराड्याकडे धावलो. पण तोपर्यंत उशीर झाला होता.

सैमच्या तोंडात एक कोंबडी होती. "ओह, सैम, तू हे काय केलंस?” मी रडू लागलो.

नंतर बाबा धारदारपणे म्हणाले, “शेतकऱ्याने मला सांगितले की एकतर तो कुत्रा राहील नाहीतर तुम्ही राहाल.”

“पण आपण सॅमला कसं सोडू शकतो?” आईने विचारले.

“आपल्या जुन्या शेताची एवढीच एक आठवण आपल्याजवळ आहे.” बाबांना आईशी सहमत व्हावे लागले. मैगी आणि मी श्वास सोडला. “चिंता करू नकोस,” आई मला जवळ घेत म्हणाली.

“बाबा दुसरी एखादी नोकरी शोधतील.” पण आईबाबा काळजीत वाटत होते.

मी सैमला म्हटले, “बाबांची नोकरी गेली आणि ही सारी आपली चूक आहे. आता आपण काय करायचं?”





## ५. एक घर

आम्ही गाडीत सामान भरले. आणि परत निघालो. बाबा म्हणाले, “आपण सॅन फ्रान्सिस्कोला पोहचेपर्यन्त थांबणार नाही.”

“मी ऐकलं की तिथं खूप नोकऱ्या आहेत आणि धूळ नाही.”

आम्ही शहराच्या बाहेर तंबू ठोकला.

बाबा म्हणाले. “कॅलिफोर्नियात गर्दी आहे.”

“प्रत्येकाला काम पाहिजे आहे.”

“आपल्या सर्वांसाठी हा काळ कठीण आहे.” आई म्हणाली.

“पण तुला काही ना काही काम मिळेल.”



बाबा रोज कामाचा शोध घेत असत. रोज रात्री ते आम्हाला सांगत असत की ते कुठे कुठे गेले. आईने आम्हाला त्या मोठ्या आणि संथ चालणाऱ्या दिवसात शिकवले.





एका रात्री मैगीने दुःखाने विचारले,

“आपण कधी तरी घरी जाऊ का?”

“गप्प बस,” आई म्हणाली.

“हळूहळू परिस्थिती सुधारेल.”

“कधी? मैगीने विचारले.

पण आईचा चेहरा कठोर दिसत होता.



मग एक दिवस बाबा घरी आले आणि म्हणाले, “मिठाई आणा! आता मला नोकरी मिळाली आहे. मी एका मोठ्या दुकानात चौकीदाराचे काम करणार आहे.” त्यांनी आम्हाला जवळ घेतले. आम्हाला त्यांनी कुकीज खायला दिल्या. एवढेच नाही तर सॅमला सुद्धा दिली.

“आपले एक घर असेल का?” मैगीने विचारले.

“आपल्याजवळ घर असेल.” बाबा म्हणाले. आई म्हणाली, “आपल्याजवळ संगीत सुद्धा असेल.”

आम्ही शेवटचा एकदा ट्रक भरला.
दुसऱ्या लोकांनी आमच्याकडे बघितले.
त्यांना सुद्धा काम पाहिजे होते.

बाबा निळ्या रंगाच्या घरात गेले. "ओह!" मैगी म्हणाली. “इथं झाड आहे आणि त्याला पाने सुद्धा आहेत.”

“आणि इथं थोडीसुद्धा धूळ नाही.” मी म्हटले.





आईने रडिओ टेबलावर ठेवला.

एक मधुर, उदास गाणं लागलं होतं.

"भगवान. मी त्या रस्त्यावरून चालत आहे, मला वाटत आहे की ..”

“हे गाणं आपल्याबाबत आहे,” मी म्हटले.

“हे गाणं कठीणकाळाच्या बाबत आहे,” बाबा म्हणाले.

“आणि प्रवासाच्याबाबत आहे,” मैगी म्हणाली.

“आणि तरीही एकमेकांच्या बरोबर राहण्याबाबत आहे,” आई म्हणाली.

गाणं संपल्यावर आम्ही एकमेकांना खूप वेळ जवळ घेतलं. सॅमने आपलं नाक वर केलं आणि तो आवाज करू लागला.

“त्याला माहीत आहे आपण आपल्या घरात आहोत,” आई म्हणाली आणि आम्ही हसू लागलो.



# लेखकाचे बोल

१९३० च्या दशकात, टेक्सास, ओक्लाहोमा, कॅन्सस, कोलोरॅडो आणि न्यू मेक्सिकोच्या काही भागांमधील वाऱ्यांमुळे कोरड्या शेतातील माती उडून गेली - हा भाग "डस्ट बाउल" म्हणून ओळखला जात असे. जोरदार वाऱ्यांमुळे मातीचे जाड, फिरणारे धुळीचे ढग उडून गेले ज्यामुळे लोक आणि प्राणी घाबरले आणि मालमत्तेचे नुकसान झाले. लोक त्यांच्या घरांकडे धावले आणि श्वास घेता यावा म्हणून तोंडावर ओले कपडे बांधले. जर प्राणी धुळीच्या वादळात अडकले तर कधीकधी त्यांचा गुदमरून मृत्यू झाला.

.ही वादळे अनेक कारणांमुळे आली. त्यावेळी पाऊस फारसा पडत नसल्याने माती बारीक आणि कोरडी होती. झाडे मरून गेली, गवत सुकले आणि मुळे सुकली, त्यामुळे मातीला जागी ठेवण्यासाठी काहीही नव्हते. धूळ उडू नये म्हणून शेतकऱ्यांना त्यांचे शेत कसे नांगरायचे हे माहित नव्हते.शेतकरी आता जमिनीवर जगू शकत नसल्याने, त्यांची घरे आणि जमीन विकली गेली - किंवा बँकेने ती परत ताब्यात घेतली - जेणेकरून ते त्यांचे कर्ज फेडू शकतील.

"डस्ट बाउल" मधील बरेच लोक नोकरीच्या शोधात कॅलिफोर्नियाला पळून गेले. काहींना मोठ्या शेतात कमी पगाराच्या मजुरांसारखे काम मिळाले.१९४१ नंतर पाऊस येईपर्यंत तो भयानक दुष्काळ संपला नाही. सरकारने शेतकऱ्यांना त्यांच्या जमिनीचे संरक्षण करण्यासाठी वृक्ष संरक्षण पट्टे बसवण्याचे आदेश दिले.

समोच्च नांगरणीमुळे माती वाहून जाण्यापासून रोखण्यास मदत झाली. कॅलिफोर्नियाला गेलेल्या अनेक कुटुंबांना कधीही चांगले जीवन मिळाले नाही आणि ते गरीब शेतमजूर राहिले. पण जेक आणि मॅगीसारख्या काही कुटुंबांना नवीन नोकऱ्या आणि धुळीच्या वादळांमुळे कमी धोका असलेले जीवन मिळाले.